**स्वयंसिध्दा - महिलांकरीता स्वसंरक्षण**
**प्रशिक्षण कार्यक्रम**
**निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्वंसियो-२०१८/प्र.क्र.१४०/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०५ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-
१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २००२/ प्र.क्र.१३२/क्रीयुसे-१,दि. २०/६/२००३.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८.
३) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक निधी प्रस्ताव/योजना-१८७२/२०१८-१९/का-१०/ १६१४ दि. १४/५/२०१८.

**प्रस्तावना : -**

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत खेळाद्वारे सर्वासाठी सुदृढता या कार्यक्रमा सोबतच स्वसंरक्षण ही काळाची गरज बनली आहे. ही बाब लक्षात घेऊन राज्यामध्ये विद्यार्थीनी, गृहिणी तसेच नोकरी / व्यवसाय करणाऱ्या महिला यांना स्वयंसिध्दा या योजनेंतर्गत स्वसंरक्षणाचे प्रशिक्षण देणे त्याचप्रमाणे त्यांचे सबलीकरण करण्याच्या दृष्टिने त्यांचा सर्वांगीण विकास करण्यासाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरिता उपरोक्त शासन निर्णय दि. २०/६/२००३ अन्वये आर्थिक सहाय्य देण्यात येते. सदर दि.२०/६/२००३ चा शासन निर्णय सुधारित करण्याची कार्यवाही सुरु असून तोपर्यंत प्रचलित शासन निर्णयाच्या अनुषंगाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पिय तरतूद रु.२१.०० लक्ष मधून वित्त विभागाच्या दि. २/४/२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार ७० % च्या मर्यादेत रु.१४.७० लक्ष इतका निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये विद्यार्थीनी, गृहिणी तसेच नोकरी / व्यवसाय करणाऱ्या महिला यांना स्वयंसिध्दा या योजनेंतर्गत स्वसंरक्षणाचे प्रशिक्षण देण्याबरोबरच त्यांचे सबलीकरण करण्याच्या दृष्टिने त्यांचा सर्वांगिण विकास करण्यासाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०१८-१९ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित तरतूद रु.२१.०० लक्ष पैकी वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन ७० % च्या मर्यादेत रु.१४.७० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च " मागणी क्र. ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०९)(०५) स्वयंसिध्दा महिलांकरिता स्वसंरक्षण प्रशिक्षण (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) संगणक क्रमांक (२२०४-१८७२) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२/४/२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१. वित्त विभागाच्या सदर परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. २/४/२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०६१३०४३६०७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.11.06 13:11:22 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव
२. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
८. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. वरीष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, पुणे.
११. निवडनस्ती, क्रीयुसे-३.